**भायखळा महिला कारागृहात शिक्षाधिन बंदी मंजुळा शेट्ये हिचा संशयास्पद मृत्यु प्रकरणी श्रीमती स्वाती साठे, कारागृह उपमहानिरीक्षक, पुणे यांची चौकशी करण्यासाठी एक सदस्य समिती गठीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जेएलई-०८१७/प्र.क्र. १९८/२०१७/तुरुंग-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : ०९ ऑगस्ट, २०१७

**प्रस्तावना :-**

सन २०१७ च्या पावसाळी अधिवेशनात सर्वश्री.नरेंद्र पाटील व इतर विधानपरिषद सदस्य यांनी महाराष्ट्र विधानपरिषद नियम १०१ अनुसार "भायखळा महिला कारागृहात शिक्षाधिन बंदी मंजुळा शेट्ये हिचा संशयास्पद मृत्यु झाल्याबाबत" या विषयावर लक्षवेधी सुचना उपस्थित केली होती. प्रस्तुत लक्षवेधी सुचनेवर निवेदन करताना मा.राज्यमंत्री (गृह/शहरे) यांनी "मंजुळा शेट्ये मृत्यु प्रकरणी अटकेत असलेल्या महिला तुरुंग अधिकारी/ कर्मचारी यांना व्हॉटस अप ग्रुपवरुन उघडपणे मदतीचे आवाहन करणे" या अनुषंगाने विधानपरिषदेमध्ये विधानपरिषद सदस्यांनी संबंधित अधिकाऱ्यांची स्वतंत्रपणे चौकशी होणे आवश्यक असल्याबाबत केलेल्या मागणीच्या अनुषंगाने सदर प्रकरणी सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यामार्फत सविस्तर चौकशी करण्यात येईल, असे आश्वासन दिले आहे. मा.राज्यमंत्री (गृह/शहरे) यांनी दिलेले सदर आश्वासन तसेच शासनाकडे प्राप्त झालेली तक्रार विचारात घेता, या प्रकरणाची सखोल व नि:पक्षपातीपणे चौकशी करण्यासाठी एक सदस्य समिती नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

०१. सदर शासन निर्णयाद्वारे "मंजुळा शेट्ये मृत्यु प्रकरणी अटकेत असलेल्या महिला तुरुंग अधिकारी/ कर्मचारी यांना व्हॉटस अप ग्रुपवरुन उघडपणे मदतीचे आवाहन करणे" या प्रकरणी श्रीमती स्वाती साठे, कारागृह उपमहानिरीक्षक, पुणे यांची चौकशी करण्यासाठी श्री.जगदिश पाटील (भा.प्र.से.), विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांची चौकशी अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

०२. चौकशी अधिकारी यांनी प्रस्तावनेत नमुद केलेल्या लक्षवेधी सुचनेतील उपस्थित केलेल्या प्रकरणाची व सदर प्रकरणी प्राप्त झालेल्या तक्रारीच्या अनुषंगाने नि:पक्षपातीपणे सखोल चौकशी करावी.

०३. सोशल मिडीयावरील व्हॉटस ॲप ग्रुपवरील संबंधित सर्व संदेशाची माहिती, अभिलेख व इतर अनुषंगीक कागदपत्रे चौकशी अधिकाऱ्यांना अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक व सुधारसेवा, पुणे यांनी तातडीने उपलब्ध करुन दयावीत.

०४. सदर समितीने या प्रकरणाची सखोल चौकशी एक महिन्याच्या आत पुर्ण करुन त्याबाबतचा सविस्तर चौकशी अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक **२०१७०८०९१६१५०७५१२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L.Pawara

Digitally signed by Jaysing L.Pawara
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f11b49d608f53d77adcefe8115025d93bfe9dbee3f61b1c150d64818cb09f90c, cn=Jaysing L.Pawara
Date: 2017.08.09 16:05:43 +05'30'

**( ज. ल. पावरा )**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.विरोधी पक्षनेते (विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्षनेते (विधानपरिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई
७) श्री.जगदिश पाटील (भा.प्र.से.), विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण यांना उचित कार्यवाहीसाठी.
८) मा.प्रधान सचिव (अ. व सु.), मंत्रालय, मुंबई
९) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) निवडनस्ती तुरुंग-१.